**काशिद, ता.मुरूड, जि.रायगड येथील जेट्टी पर्यटनासाठी विकसीत करणे या कामाकरती रू.११२.४६ कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमआयएस ०८१८/प्र.क्र.१३७/बंदरे-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २३ जानेवारी, २०१९

**वाचा :-** मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांचे पत्र क्र. ममेबो/मुकाअ/ अभि-३/काशिद पर्यटन जेट्टी/४१४/२०१८-१९, दिनांक १९.०७.२०१८

**प्रस्तावना:**

रायगड जिल्ह्यातील मुरूड तालुक्याच्या ठिकाणापासून ५ कि.मी.अंतरावर ३.५० कि.मी. काशिद बीच आहे. काशिद बीच हे पर्यटन स्थळ असून दरवर्षी या ठिकाणी हजारो पर्यटक येत असतात. काशिद बीच रस्त्यालगत असल्यामुळे पर्यटक राज्य मार्गावरती स्वत:ची वाहने लावतात. त्यामुळे वाहतुकीचा खोळंबा होतो. तसेच पर्यटकांना तेथे टर्मिनल इमारतीची व्यवस्था नसल्यामुळे उन्हातच फिरावे लागते. तसेच पार्किंगची सुविधा नसल्याने रस्त्यावरती वाहने उभी करावी लागतात. प्रसाधन गृहाची व्यवस्था नसल्याने पर्यटकांना त्रास सहन करावा लागतो. त्याचप्रमाणे पिण्याच्या पाण्याची व विद्युत व्यवस्था सदर ठिकाणी नसल्याने पर्यटकांची गैरसोय होते. त्यानुषंगाने सदर ठिकाणी पार्किंग, टर्मिनल इमारत व जोडरस्ता, पाण्याची व्यवस्था व विद्युत व्यवस्था इ. सुविधा उपलब्ध करून देणे आवश्यक आहे. सबब, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने संदर्भाधीन पत्रान्वये काशिद, ता.मुरुड, जि.रायगड येथील जेट्टी पर्यटनासाठी विकसीत करणे या कामाचे रू.११२.४६ कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला असून सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

काशिद, ता.मुरूड, जि.रायगड येथील जेट्टी पर्यटनासाठी विकसीत करण्यासाठीच्या कामांना, केंद्र शासनाकडून मान्यता प्राप्त करण्याच्या अटीच्या अधीन राहून, सागरमाला कार्यक्रमांतर्गत खालील तक्त्यात दर्शविलेल्या रकमेच्या मर्यादेत प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामांचे स्वरूप | अंदाजपत्रकिय किंमत |
|---|---|---|
| 1 | Passenger & Ro-Ro Jetty (62.00x12.00m) | Rs.3,45,43,448 |
| 2 | Parking (240.00x80.00m) | Rs. 6,81,30,133 |
| 3 | Approach Road (600.00Rmt) | Rs.7,03,63,225 |
| 4 | Terminal Building (28.80 x 12.97 m) | Rs.1,08,61,976 |
| 5 | Breakwater (760.00 m long) | Rs.73,49,85,678.14 |
| 6 | Electrification & Water supply | Rs.50,00,000 |
| | Total | Rs.92,38,84,460.14 |
| | Add 4 % PMC Charges | Rs.3,69,55,378.41 |
| | Add 0.5 Labour Insurance | Rs.48,04,199.19 |
| | Add 12% GST | Rs.12,04,89,315.75 |
| | Add 4% Contingency | Rs.3,84,33,593.54 |
| | **Total** | **Rs.1,12,45,66,947.03** |

२. सदर प्रशासकिय मान्यता ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१. वरिल कामांचे रू.११२.४६ कोटीचे अंदाजपत्रक “राज्य सागरमाला समितीच्या” मान्यतेने केंद्र शासनास, केंद्र हिश्श्याचा ५०% निधी मिळण्याकरीता सादर करावे.

२. वरिल अंदाजपत्रकाप्रमाणे केंद्र हिश्श्याचा वाढीव निधी केंद्र शासनाकडून प्राप्त न झाल्यास, सदर वाढीव निधी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाच्या स्वनिधीतून उपलब्ध करून देण्यात येईल.

३. सदर कामास पर्यावरण तसेच इतर अनुषंगीक विभागांच्या आवश्यक परवानग्या घेण्यात याव्या.

३. वरिल कामांवरिल होणारा खर्च हा “मागणी क्र. बी-७, ३०५१ - बंदरे व दिपगृह ०२, लहान बंदरे, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, (००) (०३) जेट्टीच्या बांधकामाकरिता केंद्राचे सहाय्य (सागरमाला) (राज्य हिस्सा ५०%) (३०५१ १८९१), ३५ भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान” या लेखाशिर्षाखाली चालू आर्थिक वर्षात मंजूर तरतुदीतून भागविण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय हा केंद्र शासनाच्या सागरमाला कार्यक्रमास मान्यता देणेबाबतच्या मा.मंत्रिमंडळाच्या दि.१९.०९.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार आणि नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२४८/का.१४६१, दिनांक १२.१२.२०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४२०/२०१८/व्यय-८, दिनांक १७.१२.२०१८ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१२४१४३९१८५४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Hanmanlu Damayyawar

Digitally signed by Ashok Hanmanlu Damayyawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2bd0dc6138e4f3c9997616b47f0dc918cd4715f466afd0623c843397ffc06a09, serialNumber=2cc45c1c1345a8b6ff1e9fdbd2d12c6527f6d070c05b708bcc57b79b7ef3a95d, cn=Ashok Hanmanlu Damayyawar
Date: 2019.01.24 14:48:12 +05'30'

**(अ. ह. दमय्यावार)**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
२. प्रधान सचिव (बंदरे), मंत्रालय, मुंबई,
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
७. नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
८. निवडनस्ती (बंदरे-२).